**प्रशासकीय मान्यता**

**"शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्याची राज्य योजना मंजूर करणे."**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मृदस१४१३/प्र.क्र.२५९ /१७ अे**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२**

**तारीख: ६ सप्टेंबर, २०१४**

**प्रस्तावना** :-

राज्यामध्ये जिल्हास्तरावर २९ शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळा सध्या कार्यरत आहेत. राज्याच्या कृषि विकासात प्रामुख्याने कोरडवाहू शेतकऱ्यांच्या उत्पन्नात भरीव वाढ होण्यासाठी व जमिनीचे आरोग्य टिकविण्यासाठी एकात्मिक अन्नद्रव्ये व्यवस्थापनावर आधारीत ही योजना राबविणे आवश्यक आहे. शेतकऱ्यांमध्ये खतांचा समतोल वापरास मोठया प्रमाणात चालना मिळणार आहे. यासाठी राज्यातील स्थानिक गरज विचारात घेऊन शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे या माध्यमातून राज्यातील शेतकऱ्यांना जमीन आरोग्य पत्रिका वाटप करणे आवश्यक आहे.

राज्यातील शेतकऱ्यांना त्यांच्या शेत जमिनीतील मातीचे परिक्षण करून प्रमुख अन्नद्रव्ये नत्र,स्फुरद,पालाश व सुक्ष्म मुलद्रव्ये तांबे, मंगल, जस्त, लोह इत्यादी अन्नद्रव्यांची कमतरतेबाबतची माहिती मृद विश्लेषणाद्वारे देता येते. मृद विश्लेषण केल्यावर कृषि विद्यापीठाच्या शिफारशीनुसार खतांचा योग्य वापर केल्यास शेतकऱ्यांच्या उत्पादन खर्चात बचत होऊन पिक उत्पादनात वाढ होईल. या करीता जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्यासाठी आवश्यक रसायने, काच सामान तसेच अद्यावत उपकरणांची आवश्यकता भासणार आहे. माती परिक्षणाबाबत शेतकऱ्यांमध्ये जन जागृती निर्माण केल्यास शेतकरी माती परीक्षण करून घेण्यास स्वत: प्रवृत्त होईल याचा उपयोग रासायनिक खतांचा कार्यक्षम व समतोल वापर करण्यास चालना मिळेल. सन २०००-०१ ते २०१२-१३ या वर्षामध्ये कृति आराखडयांगतर्गत जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) ही योजना २४०२ ०४४७ या लेखाशिर्षांतर्गत राबविली जात होती. सन २०१२-१३ या वर्षात ही योजना केंद्र शासनाकडून बंद करण्यात आलेली आहे.सदर योजना चालू ठेवणे आवश्यक असल्याने शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्याची राज्य योजना मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्याच्या कृषि विकासात प्रामुख्याने कोरडवाहू शेतकऱ्यांच्या उत्पन्नात भरीव वाढ होण्यासाठी व जमिनीचे आरोग्य टिकविण्यासाठी एकात्मिक अन्नद्रव्ये व्यवस्थापनावर आधारीत योजना राबविणे आवश्यक असल्याने शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे या राज्य योजनेस शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**योजनेचा उद्देश** :-

१) प्रयोगशाळेतील मृद विश्लेषणासाठी आवश्यक काचसामान व रसायने खरेदी करणे.

२) शासकीय व नोंदणीकृत अशासकीय मृद चाचणी प्रयोगशाळेतील अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण देणे.

३) माती परीक्षणाची जनजागृती होण्यासाठी प्रचार व प्रसिध्दी करणे.

४) प्रयोगशाळेत आवश्यकतेनुसार अद्यावत उपकरणे खरेदी करणे.

५) प्रयोगशाळेतील उपकरणांची देखभाल व दुरुस्ती करणे.

**योजनेची अंमलबजावणी** :-

जिल्हास्तरावर २९ शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्यासाठी आवश्यक रसायने, काच सामान तसेच अद्यावत उपकरणांची खरेदी करून सदर प्रयोगशाळेतील मृद विश्लेषणाचे काम विहित वेळेत पुर्ण करून शेतकऱ्यांना विश्लेषण अहवाल (जमीन आरोग्य पत्रिका) वेळेत देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

**आर्थिक कार्यक्रम** :-

ही योजना सन २०१४-१५ ते २०१८-१९ या पाच वर्षासाठी राबविण्यात येईल. सन २०१४-१५ मध्ये रुपये ३४५.९२ लक्ष व सन २०१४-१५ ते सन २०१८-१९ या पाच वर्षाच्या कालावधीसाठी रुपये १७२९.६० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावित निधीच्या तरतुदीस मान्यता देण्यात येत आहे. शासकीय जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचा बळकटीकरण करणे या नवीन वार्षिक योजनेत खालील घटकांचा (बाब) समावेश करण्यात येईल :-

| अ क्र | घटकाचा (बाब) तपशील | भौतिक | आर्थिक (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | काच सामान व रसायने खरेदी | २९ मृसमृचा प्रयोगशाळा | ८७.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | शासकीय व नोंदणीकृत अशासकीय मृद चाचणी प्रयोगशाळेतील अधिकारी व कर्मचारी यांचे प्रशिक्षण | ५०प्रशिक्षणार्थी( रू.५०००/- प्रती प्रशिक्षणार्थी) | २.५० |
| ३ | माती परिक्षण विषयी प्रचार व प्रसिध्दी करणे | ३३ जिल्हे | ३३.०० |
| ४ | प्रयोगशाळेत आवश्यकतेनुसार अद्यावत उपकरणे खरेदी करणे | २९ मृसमृचा प्रयोगशाळा | २००.०० |
| ५ | उपकरणे देखभाल व दुरुस्ती | २९ मृसमृचा प्रयोगशाळा | २०.०० |
| ६ | आकस्मिक खर्च | २९ मृसमृचा प्रयोगशाळा | ३.४२ |
| | **एकूण** | | **३४५.९२** |

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १९१/१४३१, दि.११/८/२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७८/२०१४/व्यय १, दि.३/९/१४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra .gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०९०६१७५४०८५३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Vasave Akusing N

Digitally signed by Vasave Akusing N
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasave Akusing N
Date: 2014.09.06 17:49:21 +05'30'

(आ.न.वसावे)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव

३) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव

५) मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव

६) अपर मुख्य सचिव (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

७) अपर मुख्य सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई-३२

८) अपर मुख्य सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर

११) सर्व विधान मंडळ सदस्य, विधान भवन मुंबई-३२

१२) सर्व राजकीय पक्षांची मुख्य कार्यालये

१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१४) सर्व संचालक/ सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे

१५) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे

१६) सर्व विभागीय कृषि सहसंचालक

१७) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय ग्रंथालय, विधान भवन मुंबई-३२ (दोन प्रती)

२०) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई

२१) नियोजन विभाग-१४३१

२२) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

२३) सर्व कक्ष अधिकारी/अवर सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२४) निवडनस्ती